## सामान्य प्रशासन विभाग

## मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० ऑक्टोबर, १९९५.

109

भारताचे संविधान.

क्रमांक : आरटीआर १०९४/प्र.क्र.९/९४/१२- भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन आणि अस्तित्वात असलेले संबंधित सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमिक करुन, महाराष्ट्राचे राज्यपाल याद्वारे महाराष्ट्र शासनाच्या विभागातील, सोबत जोडलेल्या अनुसूचितील गट "ड" पदाच्या सेवाभरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत, जसे :-

१. या नियमांना महाराष्ट्र शासनाच्या विभागातील गट "ड" पदांचे (सेवाप्रवेश) नियम, १९९५ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर, --

(अ) अनुसूचीमध्ये नमूद केलेल्या पदांवर सेवाभरती करण्याबाबत "नियुक्ती प्राधिकारी" म्हणजे त्या पदावर नेमणुका करण्यात जो सक्षम आहे असा प्राधिकारी ;

(ब) विभाग म्हणजे संविधानाच्या अनुच्छेद-१६६ अन्वये बनविलेल्या महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीच्या पहिल्या अनुसूचीमध्ये निर्दिष्ट केलेले विभाग, यामध्ये अशा नियमांच्या अधिपत्याखालील इतर कार्यालये देखील अंतर्भूत आहेत ;

(क) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन ;

(ड) "अनुसूची" म्हणजे या नियमांना जोडलेली अनुसूची.

३. अनुसूचीमधील भाग "अ" मध्ये उल्लेख केलेल्या पदांवरील नेमणुका अनुसूचीमधील भाग "ब" मध्ये नमूद केलेल्या पदांवर काम करीत आहेत अशा व्यक्तींमधून आणि अनुसूची भाग "क" मधील पदांवर काम करीत आहेत , आणि ज्यांची किमान ३ वर्षांची नियमित सेवा त्या पदांवर झालेली आहे आणि नियम-६ च्या खंड "क" च्या उपखंड (२) मधील नामनिर्देशनाने भरतीसाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता धारण करीत आहेत अशा व्यक्तींमधून "ज्येष्ठता अधीन पात्रता" या आधारावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने करता येतील.

४. अनुसूचीमधील भाग "ब" मध्ये उल्लेख केलेल्या पदांवरील नेमणुका पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येतील :-

(अ) अनुसूची मधील भाग "ड" मध्ये उल्लेख केलेल्या पदावर काम करीत असलेल्या आणि ज्यांची त्या पदांवर किमान ३ वर्षांची नियमित सेवा झाली आहे त्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या आधारावर पात्र ठरलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने किंवा,

(ब) अनुसूचीमधील भाग "क" मधील पदांवर काम करीत असलेल्या आणि नियम "६" च्या खंड "क" च्या उपखंड (२) मधील शैक्षणिक अर्हता धारण करीत असलेल्या योग्य व्यक्तींच्या बदलीने.

५. अनुसूचीमधील भाग "क" मध्ये उल्लेख केलेल्या पदांवरील नेमणुका अनुसूचीमधील भाग "ई" मध्ये नमूद केलेल्या पदांवर काम करीत असलेल्या व्यक्तींकडून, ज्यांची किमान ३ वर्षांची नियमित सेवा त्या पदांवर झालेली आहे, अशा व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या आधारावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने करता येतील.

६. अनुसूचीमधील भाग "ड" मध्ये उल्लेख केलेल्या पदांवरील नेमणुका पुढीलपैकी कोणत्याही पद्धतीने करता येतील :-

(अ) अनुसूची भाग "फ" मध्ये उल्लेख केलेल्या पदांवर काम करीत असलेल्या व्यक्तींमधून ज्यांनी त्या पदांवर किमान ३ वर्षांची नियमित सेवा झालेली आहे, अशा व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या आधारावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने किंवा,

(ब) अनुसूचीमधील भाग "ई" मधील काम करीत असलेल्या आणि नियम-६ च्या खंड (क) च्या उपखंड (२) मधील शैक्षणिक अर्हता धारण करीत असलेल्या योग्य व्यक्तींच्या बदलीने किंवा,

(क) पुढील अटी पूर्ण करणा-या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने :-

(१) ज्यांचे वय १८ वर्षांपेक्षा कमी आणि ३० वर्षांपेक्षा जास्त नाही आणि

(२) जो शासनाने मान्यता दिलेल्या शाळेमधून प्राथमिक शाळेची ४ थी इयत्ता उत्तीर्ण आहे.

परंतु, नियुक्ती प्राधिका-यांस जे माजी सैनिक किंवा लष्करी सेवेचे निवृत्ती वेतनधारक आहेत अशा उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा ४५ वर्षांपर्यंत शिथिल करता येईल.

७. अनुसूची "ई" मध्ये उल्लेख केलेल्या पदांवरील नेमणुका ज्यांचे वय १८ वर्षांपेक्षा कमी आणि ३० वर्षांपेक्षा जास्त नाही, अशा उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करता येतील. परंतु, नियुक्ती प्राधिका-यास जे माजी सैनिक किंवा लष्करी सेवेचे निवृत्ती वेतनधारक आहेत अशा उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा ४५ वर्षांपर्यंत शिथिल करता येईल.

८. अनुसूचीमधील भाग "फ" मध्ये उल्लेख केलेल्या पदांवरील नेमणुका :-

(१) ज्यांचे वय १५ वर्षांपेक्षा कमी नाही आणि १८ वर्षांपेक्षा जास्त नाही आणि

(२) जो शासनाने मान्यता दिलेल्या शाळेमधून प्राथमिक शाळेची ४ थी इयत्ता उत्तीर्ण आहे उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करता येतील.

९. वरील नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी अनुसूचिमध्ये उल्लेख केलेल्या पदांपैकी ... पदांवर आवश्यकतेनुसार शासनास योग्य वाटतील असे विशेष अथवा सर्वसाधारण आदेश निर्गमित ... निर्देशित केलेल्या पध्दतीनुसार विशेष परिस्थितीत सेवा भरती करता येईल.

## अनुसूची

| अ.क्र. | पदनाम |
|---|---|
| | भाग-अ |
| १ | जमादार |
| २ | चोपदार |
| | भाग-ब |
| ३ | हवालदार |

४ नाईक
५ उद्वाहन चालक
६ आवेष्टक
७ फाईल करी
८ दफ्तरी
९ दप्तरबंद
१० रोनिओ शिपाई/रोनिओ चालक
११ मुकादम
१२ दारवान

भाग-क

१३ स्वच्छक मुकादम
१४ सफाईगार मुकादम

भाग-ड

१५ शिपाई
१६ सहायक दारवान
१७ संदेश वाहक

भाग-इ

१८ स्वच्छक
१९ सफाईगार

भाग-फ

२० बाल शिपाई

---

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

य.मा.जोशी
शासनाचे उप सचिव.